**विनंतीवरुन/संवर्गबाहय बदली याबाबतचे धोरण निश्चित करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही-२०१०/प्र.क्र.२१०/१०/१२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३.६.२०११

वाचा : (१) शासन परिपत्रक, क्रमांक:एएससी-१०८९/चौदा-अ, दि.२१ एप्रिल १९८२,
(२) शासन परिपत्रक, क्रमांक:एसआरव्ही-१०८७/सीआर-४९/१६-अ, दि.१४ मार्च १९८८,
(३) महाराष्ट्र राज्य शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम-२००५ ( शासन अधिसुचना आणि पृष्ठांकन,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:एसआरव्ही- २००४/प्र.क्र.१५/०४/१२, दि.२५ मे,२००६,
(४) शासन परिपत्रक, क्रमांक:एसआरव्ही-२००४/प्र.क्र.१५/०४/१२, दि.७.६.२००६.

## शासन निर्णय

संदर्भाधीन अ.क्र. ३ येथील अधिसूचनेन्वये महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ लागू झाला आहे. सदर अधिनियम दिनांक १ जुलै २००६ पासून लागू झाला असून यामुळे सदर अधिनियम अस्तित्वात येण्यापूर्वी शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांसंदर्भात या विभागाने निर्गमित केलेले सर्व आदेश दिनांक १ जुलै,२००६ पासून अधिक्रमित झाले असे समजण्याबाबत संदर्भाधीन अ.क्र.४ येथील शासन परिपत्रकान्वये स्पष्ट केले आहे.

२. बदलीच्या अधिनियमात विनंतीवरुन /संवर्गबाहय बदली याबाबत विनिर्दीष्ट तरतूद नाही. बदलीच्या अधिनियमातील कलम १४(१) खालील तरतुदीनुसार तपशीलवार नियम तयार करण्यात येत आहेत. मात्र, हे नियम अंतिम होऊन प्रसिध्द होण्यास काही कालावधी अपेक्षित आहे. तथापि संदर्भाधीन अ.क्र.४ येथील शासन परिपत्रकात स्पष्ट केल्यानुसार संदर्भाधीन अ.क्र. १ येथील बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयात नियुक्त, लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवारांच्या बदलीबाबतचे व अ.क्र. २ येथील विवाहीत महिला कर्मचा-यांच्या बदलीबाबतचे शासन परिपत्रक अधिक्रमित झाले आहे. यामुळे विवाहीत महिला कर्मचा-यांची तसेच बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयात नियुक्त, लोकसेवा आयोग पुरस्कृत कर्मचा-यांची विनंतीवरुन/संवर्गबाहय बदली करण्यास मान्यता देण्याचे प्रस्ताव विविध प्रशासकीय विभागांकडून प्राप्त होत होते. तसेच कर्मचारी संघटना, शासकीय कर्मचारी यांच्याकडूनही याबाबत निवेदने प्राप्त होत होती. यासंदर्भातील धोरण विहित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

३. याअनुषंगाने शासन सेवेतील गट - ब (अराजपत्रित) व गट - क मधील कर्मचा-यांची विनंतीवरुन / संवर्गबाहय बदली करण्यासाठी अटी व शर्ती खालीलप्रमाणे विहित करण्यात येत आहेत.:-

**१)** विनंतीवरुन, संवर्गबाहय बदली केवळ त्याच पदावर अथवा समकक्ष पदावर करता येईल. अपवादात्मक परिस्थितीत कनिष्ठ (वेतनश्रेणी) वेतनबँड व ग्रेड पे मधील पदावर बदली करता येईल. मात्र, ज्या पदांकरीता विशिष्ट तांत्रिक वा अन्य अर्हता विहित केली असेल व स्वतंत्र निवडप्रक्रीया अवलंबण्यात येत असेल अशा संवर्गबाहय पदावर बदली अनुज्ञेय होणार नाही.

**२)** संबंधित कर्मचाऱ्याची नियुक्ती नियमित असावी व त्याला / तिला स्थायित्व प्रमाणपत्र देण्यात आले असावे.

३) संबंधित कर्मचाऱ्याची किमान ५ वर्षे सेवा पूर्ण झाली असावी. अपवादात्मक परिस्थितीत हा कालावधी २ वर्षे इतका शिथिल करता येईल म्हणजेच किमान ३ वर्षे सेवा पूर्ण झाली असल्यास अपवादात्मक परिस्थितीत विनंती विचारात घेता येईल.

४) विनंतीवरुन, संवर्गबाहय बदली जिल्हास्तरावर बदलीपात्र पदधारकांच्या बाबतीत केवळ अन्य जिल्हयातील संबंधित विभागप्रमुखांच्या अधिपत्याखालील कार्यालयात अथवा अन्य विभागप्रमुखांच्या अधिपत्याखालील कार्यालयात करता येईल आणि महसूली विभागस्तरावर बदलीपात्र पदधारकांच्या बाबतीत अन्य महसूली विभागातील संबंधित विभागप्रमुखांच्या अधिपत्याखालील कार्यालयात अथवा अन्य विभागप्रमुखांच्या अधिपत्याखालील कार्यालयात करता येईल.

५) प्रशासनाचे हित, सार्वजनिक सेवेचे हित विचारात घेऊन बदली करता येईल. संबंधित कर्मचारी ज्या कार्यालयात कार्यरत असेल त्या कार्यालयाच्या विभागप्रमुखांनी तसेच ज्या कार्यालयात बदलीबाबत विनंती केली आहे त्या विभागप्रमुखांनी बदलीसंदर्भात ना-हरकत प्रमाणपत्र देणे आवश्यक राहील.

६) ज्या पदावर बदलीबाबत विनंती केली आहे ते पद निर्बाध रिक्त असणे आवश्यक राहील. तसेच संबंधित कर्मचा-याने समान पदावर बदलीबाबत विनंती केली असल्यास त्याची ज्या मार्गाने (उदा:- पदोन्नती, नामनिर्देशन) नियुक्ती झाली आहे त्या कोटयातील पद उपलब्ध असणे आवश्यक राहील. मात्र कर्मचा-याने अन्य समकक्ष अथवा निम्न पदावर बदलीबाबत विनंती केली असल्यास सरळसेवा कोटयातील पद उपलब्ध असणे आवश्यक राहील. तसेच संबंधित कर्मचारी ज्या प्रवर्गातील आहे (उदा:- खुला प्रवर्ग, अ.जा., इ.) त्या प्रवर्गाचे पद उपलब्ध असणे आवश्यक राहील.

७) ज्या पदावर बदलीबाबत विनंती केली आहे त्या पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदी तसेच त्या पदास विहित केलेल्या परीक्षा व अन्य बाबींची पूर्तता करणे आवश्यक राहील.

८) संबंधित कर्मचा-याची बदलीनंतर त्या पदावरील ज्येष्ठता रुजू झालेल्या दिनांकास निश्चित होईल. तसेच पुर्वीच्या सेवेचा लाभ वेतननिश्चिती, रजा, निवृत्तीवेतन याकरीता वित्त विभागाच्या संबंधित नियमातील तरतुदीनुसार अनुज्ञेय होईल.

९) या बदलीच्या अनुषंगाने, पदग्रहण अवधी, बदली अनुदान, प्रवास भत्ता वा तद्नुषंगिक लाभ अनुज्ञेय होणार नाहीत.

१०) लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील पदावर बदलीसंदर्भात लोकसेवा आयोगाची मान्यता आवश्यक राहील.

११) वरीलप्रमाणे विहित केलेल्या सर्व अटी मान्य असल्याचे संबंधित कर्मचा-यांकडून लेखी स्वरुपात (बंधपत्र) घेणे आवश्यक राहील.

१२) अशा बदल्यांचे अधिकार, बदलीच्या अधिनियमात नमूद सक्षम प्राधिका-यांना राहतील.

४. प्रशासकीय विभाग/विभागप्रमुख/प्रादेशिक विभागप्रमुख यांनी यासंबंधीचे प्रस्ताव वर नमूद अटी व शर्तीनुसार तपासून उचित कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०६०३१७४४३५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

के.पी.बक्षी
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.**

E:\GR\20112-2-2011.lwp

प्रति,

राज्यपालांचे सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई,
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व विधान परिषद सदस्य, विधानसभा सदस्य,
सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
सर्व मंत्रालयीन विभागांचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली,
सर्व मंत्रालयीन विभाग,
* प्रबंधक,मूळ शाखा,उच्च न्यायालय,मुंबई ,
* प्रबंधक,अपील शाखा,उच्च न्यायालय,मुंबई,
* प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधीकरण, मुंबई.
* प्रबंधक,लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय,मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई ,
* प्रधान सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद) मुंबई,
* प्रधान सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा)मुंबई,
* राज्य निवडणूक आयुक्त,राज्य निवडणूक आयोग,नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
* महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
* महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र, नागपूर,
* महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व परीक्षा),महाराष्ट्र, नागपूर,
मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मुंबई, (२ प्रती प्रसिध्दीकरिता)
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक विभागप्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवडनस्ती,

*पत्राने.

E:\GR\20112-2-2011.lwp